**सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेसंदर्भातील मुद्यांचे स्पष्टीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः वेतन -१११९ /प्र.क्र.०८ /सेवा- ३**
खो.क्र.३३५ (विस्तार), तिसरा मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ११ मे, २०१७.

<u>वाचा-</u>

१) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दिनांक १ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.वेतन ११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दिनांक ५ जुलै, २०१०.
३) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.वेतन ११११/प्र.क्र.८/सेवा-३, दिनांक १ जुलै, २०११
४) शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, क्र.वेतन ११११/प्र.क्र.८/सेवा-३, दिनांक ०९ डिसेंबर, २०१६

**शासन शुद्धीपत्रक** -

शासन निर्णय वित्त विभाग, दिनांक ०१ जुलै २०११ समवेतच्या मुद्दा क्रमांक १ समोरील स्पष्टीकरण रद्द करुन त्या मुद्यांबाबतचे सुधारीत स्पष्टीकरण, शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, दिनांक ०९.१२.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहे.

सदर शुद्धीपत्रक निर्गमित केल्याच्या अनुषंगाने महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), नागपूर व मुंबई या कार्यालयांना शासनाच्या विविध खात्यांकडून सुधारीत निवृत्तीवेतनविषयक लाभ मंजूरीचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने उपस्थित होत असलेल्या मुद्यांबाबत स्पष्टीकरण निर्गमित करावे, अशी विनंती सदरहू दोन्ही कार्यालयांनी, वित्त विभागास त्यांच्या अनुक्रमे पत्र क्र.पीएम/जीआर-III/जनरल/४०० व ४५१ दि.२७.०१.२०१७ व दि.२०.०२.२०१७ तसेच अशा पत्र क्र.पीएम/दुरुस्ती दि.०९.१२.२०१६/६०५२८२१७ व ६०५३३१२२ दि.०८.०२.२०१७ तसेच दि.१७.०३.२०१७ अन्वये केली आहे. तरी सदर कार्यालयांनी उपस्थित केलेल्या मुद्यांबाबत, मुद्देनिहाय स्पष्टीकरण / खुलासा, या शासन शुद्धीपत्रकासमवेत जोडलेल्या जोडपत्राद्वारे करण्यात येत आहे.

हे शुद्धीपत्रक वित्त विभागातील सेवा-४ कार्यासनाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५७/२०१७ दि.१०.०४.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस व शासन मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०५१११६५९४७९२०५ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Devidasrao Londhe

Digitally signed by Shrikant Devidasrao Londhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9d297f5b1e7f2bf7e6f49cd44c8fa4445bb6dd845973cab6e8165c47a8f46a4, serialNumber=b973cbc71c4136d97edeae58395e03da221147d1afdd343ba4d7a2492e6a54b6, cn=Shrikant Devidasrao Londhe
Date: 2017.05.11 16:58:20 +05'30'

**( श्री.दे.लोंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
४. सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
५. सर्व मंत्रालयीन विभाग,
६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, मा.सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
८. सचिव, मा.अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई
९. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
१०. *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
११. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१३. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१४. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
१५. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
१६. आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
१७. सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई -३२
१८. सर्व विभागीय आयुक्त,
१९. सर्व जिल्हाधिकारी,
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२१. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

२२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
२५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
२६. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
२७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२९. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
३०. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
३१. जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषी विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी
३२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३४. लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई / नागपूर / पुणे/ औरंगाबाद
३५. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
३६. *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
३७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
३८. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १
३९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०
४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४,राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई ४
४१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३
४२. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५
४३. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१
४४. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८
४५. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
४६. निवड नस्ती, कार्यासन सेवा-३.

*पत्राद्वारे.

शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग क्रमांक वेतन-११११/प्र.क्र.८/सेवा-३, दिनांक ११.०५.२०१७ समवेतचे

**जोडपत्र**

| मुद्दा क्रमांक | मुद्यातील आशय | स्पष्टीकरण / खुलासा |
|---|---|---|
| अ. | महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम १९८२ मधील नियम क्रमांक ९(३६) तसेच नियम क्रमांक १११(४) मधील तरतुदीनुसार, संबंधित शासकीय कर्मचाऱ्याने प्रत्यक्षात आहारित केलेले मासिक वेतन (Pay actually drawn) (Not notional pay) हे उपदानाची परिगणना करतांना विचारात घेणे अपेक्षित आहे. शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग दिनांक ०९.१२.२०१६ अन्वये संबंधित कर्मचाऱ्यांना दुसऱ्या लाभ मंजूरीच्या अनुषंगाने दिनांक ३१.०३.२०१० पर्यंतच्या थकबाकीची रक्कम अनुज्ञेय नाही, ही बाब विचारात घेता दिनांक ०१.१०.२००६ ते दि.३१.०३.२०१० या कालावधीमध्ये निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना, सदर कालावधीतील काल्पनिक वेतनावर आधारीत, उपदानाच्या थकबाकीची रक्कम प्राधिकृत करता येणार नाही. | शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०१.०४.२०१० अन्वये ज्या कर्मचाऱ्यांनी सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ यथास्थिती दि.०१.०४.२०१० वा नंतरच्या तारखेस प्रत्यक्षात घेतला आहे. अशा कर्मचाऱ्यांना निवृत्तीवेतन विषयक लाभ यथास्थिती दि.०१.०४.२०१० वा नंतरच्या तारखेपासून पासून मंजूर करण्यात आले / प्राधिकृत करण्यात आले आहेत, त्यावेळी संबंधित कर्मचाऱ्यांना दिनांक ०१.१०.२००६ ते त्यांच्या दुसऱ्या लाभ अनुज्ञेयतेच्या तारखेपर्यंत पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीमध्ये / वेतन संरचनेमध्ये काल्पनिक वेतननिश्चितीचा लाभ परिगणीत झाला आहे. त्या अनुषंगाने त्यांना दुसरा लाभ मंजूरीच्या काल्पनिक वेतन निश्चितीच्या थकबाकीची रक्कम मंजूर करण्यात आली नाही. सदर शासन निर्णयानुसार संबंधितांना यापूर्वी उपदानाची रक्कम परिगणीत करतांना त्यांनी प्रत्यक्ष आहारीत केलेले वेतन (निवृत्तीवेतन नियम क्रमांक ९(३६) तसेच नियम क्रमांक १११(४) मधील तरतूद) विचारात घेवून प्राधिकृत केले आहे. त्यामुळे शासन अधिसूचना वित्त विभाग दिनांक २७.१०.२०१४ मधील तरतूदीनुसार |
| ब. | शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, दिनांक ०९.१२.२०१६ यामध्ये दिनांक ०१.१०.२००६ ते दि.३१.०३.२०१० या कालावधीतील निवृत्तीवेतन धारकांना निवृत्तीवेतन विषयक लाभ कोणत्या तारखेपासून लागू राहतील याची स्पष्टता नाही. (silent on the date) | |

| | | |
|---|---|---|
| | | दि.०१.१०.२००६ ते दि.३१.०३.२०१० या कालावधीमध्ये निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना, शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग दिनांक ०९.१२.२०१६ च्या अनुषंगाने, दुसरा लाभ मंजूरीची तारीख ते त्यांच्या सेवानिवृत्तीची तारीख या कालावधीसाठी काल्पनिक वेतननिश्चिती करुन या काल्पनिक वेतननिश्चितीच्या आधारे त्यांना उपदान, रजा रोखीकरण, सुधारीत अंशराशीकरण यांच्या फरकाच्या रकमा मंजूर करणे आवश्यक आहे. मात्र त्यांच्या सेवानिवृत्तीची तारीख ते दिनांक ३१.०३.२०१० या कालावधीसाठी त्यांना निवृत्तीवेतनाची थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही. परंतु त्यांना दिनांक ०१.०४.२०१० पासून सुधारीत निवृत्तीवेतन व त्याबाबतची थकबाकी अनुज्ञेय राहील. |
| क. | शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०५.०७.२०१० मधील परि. क्र. ड(३) मध्ये दुसरा लाभ मंजूरीच्या अनुषंगाने दि.०१.१०.२००६ ते दि.३१.०३.२०१० या कालावधीची काल्पनिक वेतननिश्चिती करुन प्रत्यक्ष लाभ (Actual benefit) दिनांक ०१.०४.२०१० पासून अनुज्ञेय केला आहे. या पार्श्वभूमीवर, शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, दिनांक ०९.१२.२०१६ अन्वये, दुसऱ्या लाभास पात्र ठरणाऱ्या कर्मचाऱ्यांना, प्रत्यक्ष लाभ हे दि.०१.०४.२०१० पासून अनुज्ञेय ठरतील, अशी धारणा आहे. | शासन निर्णय वित्त विभाग, दिनांक ०५.०७.२०१० मधील परिच्छेद क्रमांक ड(३) ऐवजी शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०१.०४.२०१० मधील परिच्छेद क्रमांक क(३) च्या अनुषंगाने आपल्या कार्यालयाने धारणा व्यक्त करुन ही धारणा पक्की करण्याची या विभागाकडून अपेक्षिले असल्याचे दिसून येते. या संदर्भात आवश्यक स्पष्टीकरण मुद्दा क्रमांक (अ) व मुद्दा क्रमांक (ब) समोर दिलेले आहे. सदर स्पष्टीकरण विचारात घेता लगतच्या शंकेचे निरसन होणे अपेक्षित आहे. |

| | | |
|---|---|---|
| ड. | शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग दिनांक ०९.१२.२०१६ मध्ये निवृत्तीवेतनाच्या सुधारीत अंशराशीकरणाच्या (Revision of commutation of Pension) अनुज्ञेयतेबाबत उल्लेख नसल्याने, सदर सुधारीत अंशराशीकरणाच्या लाभाची मागणी करण्याचा संबंधित कर्मचाऱ्यांना हक्क पोहोचत नाही. | या संदर्भात मुद्दा क्रमांक (अ) व (ब) समोरील स्पष्टीकरण विचारात घेता लगतच्या मुद्यामध्ये उपस्थित केलेल्या शंकेचे निरसन होणे अपेक्षित आहे. |
| इ. | निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरणाच्या फरकाची रक्कम संबंधिताला अनुज्ञेय करावयाची झाल्यास त्यासाठीची कार्यपद्धत स्पष्ट करण्यात यावी. | महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंधराशीकरण) नियम-१९८४ मधील नियम क्र.१० मधील तरतूदीनुसार एखाद्या अर्जदाराने आपल्या अंतीम निवृत्तीवेनाच्या काही भागाचे अंशराशीकरण केले असेल आणि त्यानंतर शासकीय निर्णयान्वये त्याच्या निवृत्तीवेतनात भूतलक्षी सुधारणा व वाढ झाली असेल, अशा वाढीव निवृत्तीवेतनाच्या संदर्भात निर्धारित केलेले अंशराशीकृत मूल्य आणि अगोदरच प्राधिकृत केलेले अंशराशीकृत मूल्य यामधील फरकाची रक्कम अर्जदाराला प्रदान करण्यात येईल. या रकमेच्या प्रदानासाठी अर्जदाराने नव्याने अर्ज करणे आवश्यक असणार नाही. सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या दुसरा लाभ मंजूरीच्या अनुषंगाने, संबंधित निवृत्तीवेतन धारकाचे, निवृत्तीवेतनाच्या तारखेच्या वेतनात वाढ होणे अपेक्षित असल्याने त्याच्या परिणामी संबंधिताच्या निवृत्ती वेतनाच्या रकमेत वाढ/सुधारणा होणे अपेक्षित आहे. तसेच, नमुद करण्यात येते की,निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण करण्याची बाब ही वैकल्पिक (Optional) असल्याने वाढीव निवृत्तीवेतनाच्या |

| | | |
|---|---|---|
| | | रकमेचे अंशराशीकरण करावयाचे किंवा कसे ? याबाबत संबंधित विभागाने/कार्यालय प्रमुखाने संबंधित कर्मचाऱ्याकडून इच्छुकता मागवून घेऊन सदर कर्मचारी इच्छुक असल्यास त्याच्याकडून विहीत नमुन्यातील निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरणाबाबतचा अर्ज भरून घेऊन महालेखापाल कार्यालयास प्राधिकार पत्र निर्गमित करण्यासाठी पाठविणे आवश्यक आहे. तसेच, अशा आशयाचा प्रस्ताव महालेखापाल कार्यालयास प्राप्त झाल्यानंतर त्या कार्यालयाने प्राधिकारपत्रे सर्व संबंधितांना निर्गमित करणे अपेक्षित आहे. |

Shrikant Devidasrao Londhe

Digitally signed by Shrikant Devidasrao Londhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9d297f5b1e7f2bf7e6f49cd44c8fa4445bb6dd845973cab6e8165c47a8f46a4, serialNumber=b973cbc71c4136d97edeae58395e03da221147d1afdd343ba4d7a2492e6a54b6, cn=Shrikant Devidasrao Londhe
Date: 2017.05.11 16:59:16 +05'30'

(श्री.दे.लोंढे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन